राज्यात अपघात, आत्महत्या व बेवारस (अर्भक/मृतदेह)
इ. प्रकरणात जन्म व मृत्यू नोंदणी करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन परिपत्रक क्र. संकीर्ण १११९/प्र.क्र.११४/पोल-८
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ मार्च, २०२०

## परिपत्रक

राज्यात अपघात, आत्महत्या व बेवारस (अर्भक/ मृतदेह), इत्यादी प्रकरणात केंद्र शासनाच्या जन्म व मृत्यू नोंदणी अधिनियम १९६९ व महाराष्ट्र जन्म-मृत्यू नोंदणी नियम २००० नुसार करण्यात येते. केंद्र शासनाच्या सदर अधिनियम अंतर्गत कलम ८(१)(ड) मधील तरतुदी नुसार अशा प्रकारच्या जन्माच्या अथवा मृत्यूची नोंद पोलीसांमार्फत देणे कायद्याने बंधनकारक आहे.

२. केंद्र शासनाच्या जन्म व मृत्यू नोंदणी अधिनियम १९६९ मधील कलम ८(१)(ड) ची तरतुद खालीलप्रमाणे आहे.

"(ड) सार्वजनिक ठिकाणी परित्यक्त अवस्थेत आढळलेले नवजात अर्भक किंवा मृतदेह यांच्या संबंधात खेडेगावच्या बाबतील मुखिया किंवा अन्य तत्सम अधिकारी आणि इतरत्र पोलीस ठाण्याचा हुकुमतदार अधिकारी,

परंतू, ज्या व्यक्तीला असे अर्भक किंवा मृतदेह आढळून येईल, किंवा जिच्या ताब्यात असे अर्भक किंवा मृतदेह देण्यात येईल त्या व्यक्तीने पूर्वोक्त अशा मुखियाला किंवा अधिकाऱ्याला ती गोष्ट कळवली पाहिजे."

३. या प्रकरणी सदर अधिनियमातील उपरोक्त तरतूद लक्षात घेता, जन्म-मृत्यू नोंदणीसाठी आवश्यक असणारा विहित नमूना क्र. १ व २ मध्ये (नमून्याची प्रत सोबत जोडली आहे) ज्या ठिकाणी अशा प्रकारच्या घटना घडतात. अशा ठिकाणच्या स्थानिक निबंधक, जन्म-मृत्यू यांना घटनेची माहिती विहित नमून्यात पोलीसांनी देणे बंधनकारक राहील. ग्रामीण भागासाठी ग्रामसेवक, ग्रामपंचायत आणि शहरी भागासाठी मुख्याधिकारी/प्रभाग अधिकारी/ वैद्यकिय अधिकारी हे जन्म-मृत्यू निबंधक नियुक्त केले आहेत.

४. त्याशिवाय जन्म-मृत्यूच्या मूळ नोंदी उपलब्ध नसल्यास (उदा.पूर येणे, आग लागणे, निबंधकाकडील नोंदवह्या नष्ट होणे, जीर्ण होणे, इ.) याबाबत द्यावयाच्या प्रमाणपत्राबाबत घटनेच्या खात्रीसाठी संबंधित परिक्षेत्रातील पोलीस यंत्रणेने सहकार्य करावे.

५. उपरोक्त नमूद केल्यानुसार सदर प्रकरणी आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना सर्व पोलीस आयुक्त/ सर्व पोलीस अधीक्षक यांनी आपल्या अधिपत्याखालील पोलीस ठाण्यांना तातडीने देण्यात याव्यात.

६. सर्व पोलीस घटक प्रमुखांनी सदर सूचनांची अंमलबजावणी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयामार्फत होते किंवा कसे, याबाबत वेळोवेळी देखरेख (Monitoring) ठेवावी. तसेच, सदरच्या सूचना सर्व पोलीस स्टेशनचे प्रभारी अधिकारी यांच्या तात्काळ निदर्शनास आणाव्यात.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१८११०९३९५६२९ असा आहे. शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत** : विहित नमूना क्र.१ व २.

Sudhakar Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2020.03.18 13:18:22 +05'30'

**( सु. धों. पवार )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) पोलीस महासचांलक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सर्व पोलीस आयुक्त

३) सर्व पोलीस अधीक्षक

**प्रत - माहितीसाठी**

१) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) सह सचिव (पोल-८) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४) उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग/कु.कु.,जी.टी.हॉस्पिटल कॉम्प्लेक्स, मुंबई

५) निवडनस्ती.

नमुना क्र. १

# जन्म अहवाल

(नियम क्रमांक ५ पहा.)

## कायदेशीर माहिती

हा भाग जन्म नोंदवही म्हणून कायमस्वरुपी जतन करावा.

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(१) **जन्म दिनांक** ..............................
(जन्माचा अचूक दिवस, महिना व वर्ष भरावे. उदा. १/१/२०००)

(२) **लिंग** ..............................
(पुरुष, स्त्री अथवा तृतीयपंथी असे लिहावे.)

(३) **बाळाचे नाव** ..............................
(ठेवले असल्यास लिहावे.)

(४) **वडिलांचे संपूर्ण नाव** ..............................
वडिलांचा आधारकार्ड क्र. (असल्यास)
| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|

ई-मेल आयडी .............................. मोबा. नं. ..............................

(५) **आईचे संपूर्ण नाव** ..............................
आईचा आधारकार्ड क्र. (असल्यास)
| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|

ई-मेल आयडी .............................. मोबा. नं. ..............................

(६) **बाळाच्या जन्माच्या वेळी आईवडिलांचा पत्ता** ..............................

(७) **आईवडिलांचा कायमचा पत्ता** ..............................

(८) **जन्माचे ठिकाण**
(खाली नमूद केलेल्या अ, ब किवा क पैकी एकामध्ये संपूर्ण माहिती भरण्यात यावी.) उदा. रुग्णालय/घर/इतर ठिकाणी जेथे जन्म झाला असेल ते ठिकाण.
अ. रुग्णालय /संस्था नाव व पत्ता ..............................
ब. घर ..............................
(घराचा टपालाचा पत्ता)
क. इतर ..............................

(९) **माहिती देणाऱ्याचे नाव व पत्ता** ..............................

दिनांक .............................. माहिती देणाऱ्याची सही/डाव्या हाताचा अंगठा

### निबंधकाने भरावयाची माहिती

नोंदणी क्रमांक .............................. नोंदणी दिनांक ..............................
नोंदणी संस्थेचे नाव ..............................
गाव/शहर .............................. जिल्हा ..............................
शेरा ..............................

निबंधकाचे नाव, सही व शिक्का

प्रमाणपत्र दिल्याचा दिनांक ...... प्राधिकाऱ्याचा पत्ता

---

नमुना क्र. १

# जन्म अहवाल

## सांख्यिकी माहिती

या भागाची माहिती कापून पुढील संकलनासाठी पं.स./न.पं./न.पा./म.न.पा./कॅ. बोर्डाकडे पाठविण्यात यावी.

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(१०) **आईचे नेहमीचे राहण्याचे ठिकाण** ..............................
(जेथे आई नेहमी राहते ते ठिकाण, जेथे प्रसूती झाली त्यापेक्षा वेगळे असू शकेल.)
(अ) गाव/शहराचे नाव ..............................
(ब) गाव आहे का शहर आहे.*
(१) गाव (२) शहर
(क) तालुक्याचे नाव ..............................
(ड) जिल्ह्याचे नाव ..............................
(इ) राज्याचे नाव ..............................

(११) **कुटुंबाचा धर्म***
(१) हिंदू (२) मुस्लीम (३) ख्रिश्चन
(४) इतर धर्म (धर्माचे नाव लिहावे) ..............................

(१२) **वडिलांचे शिक्षण** ..............................
(जी इयत्ता/पदवी पास होऊन पूर्ण केली असेल ते शिक्षण लिहावे.)

(१३) **आईचे शिक्षण** ..............................
(जी इयत्ता/पदवी पास होऊन पूर्ण केली असेल ते शिक्षण लिहावे.)

(१४) **वडिलांचा व्यवसाय/नोकरी** ..............................
(जर नसेल तर निरंक लिहावे.)

(१५) **आईचा व्यवसाय/नोकरी** ..............................
(जर नसेल तर निरंक लिहावे.)

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(१६) **आईचे लग्नाच्या वेळचे वय** ..............................
(जर दोनदा लग्न झालेले असेल तर पहिल्या लग्नाच्या वेळचे वय लिहावे.)

(१७) **बाळाच्या जन्माच्या वेळी आईचे वय** .............................. वर्षे

(१८) **एकूण जिवंत जन्माला आलेल्या अपत्यांची संख्या** .............................. (या खेपेचे अपत्य धरुन)

(१९) **प्रसूती कोठे झाली***
(अ) शासकीय संस्था
(ब) खाजगी संस्था
(क) घरी का इतर ठिकाणी
**प्रसूती (क) मध्ये झाली असल्यास कोणी केली***
(क-१) डॉक्टर, नर्स, प्रशिक्षित दाई
(क-२) पारंपारिक दाई
(क-३) नातेवाईक किंवा इतर

(२०) **प्रसूतीचा प्रकार***
(अ) स्वाभाविक (ब) सिझेरियन (क) फोर्सेप/व्हॅक्युम

(२१) **जन्माच्या वेळी बाळाचे वजन** ..............................
(वजन किलोग्रॅम मध्ये)

(२२) **गरोदरपणाचा कालावधी** ..............................
(आठवडयात)

(नमूद रकाने पूर्ण भरून झाल्यावर डावीकडील स्तंभात माहिती देणाऱ्याने सही करावी.)

### निबंधकाने भरावयाची माहिती

| ठिकाण | नाव | जनगणना सांकेतांक (कोड नं.) |
|---|---|---|
| जिल्हा | | |
| तालुका | | |
| गाव/शहर | | |
| नोंदणी संस्था | | |

नोंदणी क्रमांक .............................. नोंदणी दिनांक ..............................
जन्माचा दिनांक ..............................
लिंग * (१) पुरुष (२) स्त्री (३) तृतीयपंथी
जन्माचे ठिकाण * (अ) रुग्णालय (ब) घर (क) इतर

निबंधकाचे नाव, सही व शिक्का

टीप : * योग्य त्या ठिकाणी ✓ खूण करावी.

नमुना क्र. २

## मृत्यू अहवाल
(नियम क्रमांक ५ पहा)
### कायदेशीर माहिती
हा भाग मृत्यू नोंदवही म्हणून कायमस्वरुपी जतन करावा.

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(१) मृत्यूचा दिनांक ............ दिनांक महिना वर्षे

(२) मृताचे संपूर्ण नाव ............
मृत व्यक्तिचा आधारकार्ड क्र. (असल्यास)

(३) मृत व्यक्तिचे लिंग* पुरुष स्त्री तृतीयपंथी

(४) आईचे संपूर्ण नाव ............
आईचा आधारकार्ड क्र. (असल्यास)
ई-मेल आयडी ............ मोबा. नं. ............

(५) वडिलांचे संपूर्ण नाव ............
वडिलांचा आधारकार्ड क्र. (असल्यास)
ई-मेल आयडी ............ मोबा. नं. ............

(५) अ) पतीचे/पत्नीचे संपूर्ण नाव ............
पती/पत्नीचा आधारकार्ड क्र. (असल्यास)
ई-मेल आयडी ............ मोबा. नं. ............

(६) मृत व्यक्तिचे वय ............
(जर मृत व्यक्ती १ वर्षापेक्षा जास्त वयाची असेल तर वय पूर्ण वर्षात लिहावे, जर वय १ वर्षापेक्षा कमी असेल तर महिन्यांमध्ये वय लिहावे, जर वय १ महिन्यापेक्षा कमी असेल तर वय दिवसात लिहावे व एका दिवसापेक्षा कमी असेल तर वय तासात लिहावे.)

(७) मृत व्यक्तिचा मृत्यूसमयीचा पत्ता ............

(८) मृत व्यक्तिचा कायमचा पत्ता ............

(९) मृत्यूचे ठिकाण
(खाली नमूद पैकी योग्य त्या ठिकाणी ✓ अशी खुण करावी व त्यामध्ये माहिती भरावी.)
अ. रुग्णालय / संस्था ............
ब. घर ............
(घराचा टपालाचा पत्ता)
क. इतर ............

(१०) माहिती देणाऱ्याचे नाव व पत्ता ............

दिनांक ............ माहिती देणाऱ्याची सही/डाव्या हाताचा अंगठा

### निबंधकाने भरावयाची माहिती
नोंदणी क्रमांक ............ नोंदणी दिनांक ............
नोंदणी संस्थेचे नाव ............
गाव/शहर ............ जिल्हा ............
शेरा ............

निबंधकाचे नाव, सही व शिक्का

प्रमाणपत्र दिल्याचा दिनांक प्राधिकाऱ्याचा पत्ता

टीप : * योग्य त्या ठिकाणी ✓ खूण करावी.

---

नमुना क्र. २

## मृत्यू अहवाल
### सांख्यिकी माहिती
या भागाची माहिती कापून पुढील संकलनासाठी पं.स./न.पं./न.पा./म.न.पा./कॅ. बोर्डाकडे पाठविण्यात यावी.

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(११) मृत व्यक्तीचे नेहमीचे राहण्याचे ठिकाण ............
(हे ठिकाण मृत्यूच्या ठिकाणापेक्षा वेगळे असू शकेल.)
(अ) गाव/शहराचे नाव ............
(ब) गाव आहे का शहर आहे *
(१) गाव (२) शहर
(क) तालुक्याचे नाव ............
(ड) जिल्ह्याचे नाव ............
(इ) राज्याचे नाव ............

(१२) कुटुंबाचा धर्म*
(१) हिंदू (२) मुस्लीम (३) ख्रिश्चन
(४) इतर धर्म (धर्माचे नाव लिहावे) ............

(१३) मृत व्यक्तिचा व्यवसाय/नोकरी ............
(जर नसेल तर निरंक लिहावे.)

(१४) मृत्यूपूर्वी घेतलेल्या वैद्यकीय सेवेचा प्रकार*
(१) वैद्यकीय संस्था
(२) या व्यतिरिक्त इतर वैद्यकीय सेवा
(३) वैद्यकीय सेवा मिळाली नाही.

(माहिती देणाऱ्याने खालील रकाने भरावेत.)

(१५) मृत्यूचे कारण वैद्यकीयदृष्टया प्रमाणित आहे का ? *
(अ) आहे (ब) नाही

(१६) रोगाचे नाव किंवा मृत्यूचे नेमके कारण
............
(वैद्यकीयदृष्टया प्रमाणित आहे किंवा नाही याच्याशी संबंधित नाही.)

(१७) मृत व्यक्ती स्त्री असेल व मृत्यू गरोदरपणी, प्रसुतीच्या दरम्यान किंवा प्रसुतीनंतर झाला तर खालीलपैकी एका पर्यायावर ✓ अशी खुण करावी.
अ) गरोदरपणी ब) प्रसुतीच्या वेळी क) प्रसुतीनंतर ६ आठवडयात

(१८) सिगारेट, विडी किंवा तत्सम पदार्थांचे व्यसन होते का?*
अ) होय ब) नाही
असल्यास किती वर्षे ............

(१९) तंबाखू खाण्याचे व्यसन होते का?*
अ) होय ब) नाही
असल्यास किती वर्षे ............

(२०) सुपारी किंवा पान मसाला खाण्याचे व्यसन होते का?*
अ) होय ब) नाही
असल्यास किती वर्षे ............

(२१) दारु किंवा तत्सम उत्तेजक पदार्थांचे व्यसन होते का?*
अ) होय ब) नाही
असल्यास किती वर्षे ............

(नमूद रकाने पूर्ण भरून झाल्यावर डावीकडील स्तंभात माहिती देणाऱ्याने सही करावी.)

### निबंधकाने भरावयाची माहिती

| ठिकाण | नाव | जनगणना सांकेतांक (कोड नं.) |
|---|---|---|
| जिल्हा | | |
| तालुका | | |
| गाव/शहर | | |
| नोंदणी संस्था | | |

नोंदणी क्रमांक ............ नोंदणी दिनांक ............
मृत्यूचा दिनांक ............ मृताचे वय ............
लिंग* (१) पुरुष (२) स्त्री (३) तृतीयपंथी
मृत्यूचे ठिकाण* (अ) रुग्णालय (ब) घर (क) इतर

निबंधकाचे नाव, सही व शिक्का